कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/४३४/प्र.क्र.११३/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १९/०१/२०१९

**वाचा -**

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
७) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/आर आर/३७२१/२०१८, दि. १५/११/२०१८
१०) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/उपले/आर आर/४०६२/२०१८, दि. १९/११/२०१८
११) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र. पुनर्व-२०१८/४३४/प्र.क्र.११३/र-८, दि. ०३/१२/२०१८
१२) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र. पुनर्व-२०१८/४३५/प्र.क्र.११४/र-८, दि. ०३/१२/२०१८
१३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/उपले/आर आर/४२९८/२०१८, दि. १२/१२/२०१८
१४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. पुनर्व/उपले/आर आर/४२९७/२०१८, दि. १२/१२/२०१८

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ९ व १० अन्वये कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील अनुक्रमे १८ नागरी सुविधा कामांची रु. ३,३७,६२,३८९/- व ०९ कामांची रु. ९६,४९,२५२/- एवढया रकमेची अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केली होती. तथापि, प्रस्तावित पैकी काही कामे ही पुनर्वसित गावठाणांतर्गत वाडया/वस्त्यांमधील पोहोच रस्त्याच्या डांबरीकरणाची तसेच अंतर्गत रस्त्यांच्या कॉंक्रिटीकरणाची आहेत. पुनर्वसन अधिनियमातील तरतूदीनुसार एक डांबरी पोहोच मार्ग व अंतर्गत खडीचे रस्ते देय आहेत.

तथापि, नमूद गावे ही वस्त्यांच्या स्वरुपात डोंगरउतारावर वर सरकून वसली असल्याने, पर्जन्यमानाचे अधिक प्रमाण, तीव्र उतार व खडीकरणाचे रस्ते तयार करताना येणा-या अडचणी लक्षात घेऊन सदर गावांमध्ये वस्त्यांना जोडणारे डांबरी मार्ग तसेच अंतर्गत रस्त्याचे काँक्रिटीकरण प्रस्तावित करण्यात आले आहे.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार, सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पातील पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत या विभागाकडून शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि.२५/०७/२०१३ निर्गमित करण्यात आला आहे.

तदनंतर संदर्भाधिन क्र. ५ व ८ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाकडून वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावामध्ये नमूद नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची तसेच त्यापैकी आवश्यक तेथे पोहोच रस्त्याच्या डांबरीकरणास व अंतर्गत रस्त्यांच्या काँक्रिटीकरणास क्षेत्रिय परिस्थिती व तीव्र पर्जन्यमान लक्षात घेऊन अपवादात्मक बाब म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय-

**त्यानुसार, कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधांच्या सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद २७ कामांच्या एकूण रू. ४,३४,११,६४१/- (अक्षरी रूपये चार कोटी चौतीस लक्ष अकरा हजार सहाशे एक्केचाळीस फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम १८ अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, सातारा यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) प्रस्तावाधिन सर्व अंतर्गत/मुख्य पोहोच रस्ते व लॉंच धक्का पोहोच रस्त्यांची कामे पूर्ण झाल्यानंतर एक महिन्याचे आत संबंधित जिल्हापरिषदेकडे हस्तांतरित करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्पयंत्रणा व जिल्हाधिकारी यांची राहील.

७) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या सदर सुविधा अन्य योजनेतून पुनश्च: पुरविल्या जाणार नाहीत याची विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी तसेच संबंधित यंत्रणा यांनी दक्षता घ्यावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्पयंत्रणेने दक्षता घ्यावी.

२. **<u>निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-</u>**

**अ)** कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र.२,सातारा यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

**ड)** कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा यांनी वरील क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमावरील खर्च) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९११४६५८३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2019.01.19 11:51:12 +05'30'

(द.शं.मुंजाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सातारा
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
५. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
६. कार्यकारी अभियंता, धोम कालवे विभाग क्र. २, सातारा
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१०. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) सातारा
११. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१/पी.ए.सी.,मंत्रालय, मुंबई ३२.
१५. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१८/४३४/प्र.क्र.११३/र-८, दि.१९/०१/२०१९ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील महाबळेश्वर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण १८ नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ. क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | देवळी मुरा | शाळेभोवती संरक्षक भिंत बांधणे | ४,१९,१५१/- |
| २ | देवळी | शाळेभोवती संरक्षक भिंत बांधणे | ३,७९,४७६/- |
| ३ | देवळी (पाटीलवस्ती) | पोहोच रस्त्यास संरक्षक भिंत बांधणे (०/३०० ते ०/४००) | १४,८४,०३६/- |
| ४ | देवळी मुरा | पुनर्वसित गावठाणांतर्गत वाडयावस्त्यापर्यंत अंतर्गत रस्ते कॉक्रीटीकरणाचे करणे | १५,१७,५६९/- |
| ५ | देवळी | पुनर्वसित गावठाणांतर्गत वाडयावस्त्यापर्यंत अंतर्गत रस्ते कॉक्रीटीकरणाचे करणे | ९,९९,६५०/- |
| ६ | कळमगांव | कळमगांव (हिरवेवस्ती) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे | १३,७५,५३७/- |
| ७ | कळमगांव | कळमगांव (बौद्धवस्ती) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे | २२,४०,१५८/- |
| ८ | देवळी | देवळी (बौद्धवस्ती) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे | २६,९६,२८७/- |
| ९ | देवळी | देवळी (ढेबेवस्ती) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे | २८,८८,८८२/- |
| १० | देवळी | देवळी (तळेमळा) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे | २३,११,१०३/- |
| ११ | देवळी | देवळी (पाटीलवाडी ) पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे (०/४०० ते १/२००) | ३०,८१,४७१/- |
| १२ | गोगवे | गोगवे ते हरिजनवस्ती पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे | ७,६७,५३८/- |
| १३ | गोगवे | गोगवे रिंगरोड ते हरिजनवस्ती प राममंदीर ते देसाईवस्ती आर.सी.सी गटार बांधणे | ४,३३,४७९/- |
| १४ | कोट्रोशी | मौजे सोनारवाडी ते मंदीर लॉंच धक्का आणि सुतारवाडी ते टाकीचा आंबा पोहोच रस्ता खडीकरण करणे | ५८,६२,३३८/- |
| १५ | गोगवे | गोगवे येथील राममंदीर ते देसाई वस्ती अंतर्गत रस्ते खडीकरण करणे | १३,९४,९८९/- |
| १६ | रामेघर | संधानकामध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे | ११,८६,५३७/- |
| १७ | गोगवे | गोगवे हरिजनवस्ती ते धुमाळवस्ती व मोरेवस्ती पोहोच रस्ता खडीकरण करणे | ६,२३,३५३/- |
| १८ | कोट्रोशी | मौजे कोट्रोशी येथील आंब्याचा पेढा ते लॉंच धक्का अंतर्गत रस्त्याचे खडीकरण करणे | ४१,००,८३५/- |
| १९ | तापोळा | संधानकामध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे | ९,८५,१८०/- |
| २० | कोट्रोशी | संधानकामध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे | ९,५८,९१५/- |
| २१ | रामेघर | पोहोच रस्त्यावर संरक्षक भिंत बांधणे | ११,९३,५७१/- |
| २२ | रामेघर | पोहोच रस्त्यावर मोरी बांधकाम करणे | ३,८९,४६६/- |

| अ. क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| २३ | खांबिल (चोरगे) | संधानकामध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे | ८,५३,६३६/- |
| २४ | रामेघर | प्राथमिक शाळेभोवती संरक्षक भिंत बांधणे | ३,९७,११०/- |
| २५ | गोगवे | प्राथमिक शाळेभोवती संरक्षक भिंत बांधणे | १२,५५,५७४/- |
| २६ | कोट्रोशी | प्राथमिक शाळेभोवती संरक्षक भिंत बांधणे | ६,८५,७३३/- |
| २७ | गोगवे | संधानकामध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे | २९,३०,०६७/- |
| | | **एकूण** | **४,३४,११,६४१/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2019.01.19 11:52:43 +05'30'

**( द.शं.मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**